**सन २०२१-२२ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानाच्या अंमलबजावणीकरिता रु. १५२४६.९३ लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणे व सदर अभियानांतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. ५० कोटी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो-२०२२/प्र.क्र.२०(भाग-१)/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२.
दिनांक : १७ जानेवारी, २०२२.

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P) दि. १०.०१.२०२२

२. आयुक्त, कृषि यांचे पत्र क्र. कृआ/गुनि-५/नक्र १४७/२०२१-२२/१५२०/२०२२ दि. १४.०१.२०२२

**प्रस्तावना :**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्रांची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १०० टक्के आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधी हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भ १ अन्वये कृषि यांत्रिकीकरण अभियानासाठी सन २०२१-२२ करिता केंद्र हिस्सा रु. ९१४८.१६ लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु. ६०९८.७७ लक्ष अशा एकूण रु. १५२४६.९३ लक्ष निधीच्या कार्यक्रमास मान्यता देऊन केंद्र हिश्श्याचा रु. ९१४८.१६ लक्ष निधी वितरित केला आहे. सदर योजनेकरिता केंद्र शासनाने मंजूर केलेल्या कार्यक्रमाच्या निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. १०५८०.२७ लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु. ३००० लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु. १६६६.६७ लक्ष निधीचा समावेश आहे.

वित्त विभागाच्या संदर्भांकीत दि.१४.१०.२०२१ च्या परिपत्रकान्वये कार्यक्रम खर्चासाठी अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ५० टक्के निधी वितरणाचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान केले आहेत त्यामुळे सद्य:स्थितीत, सर्वसाधारण प्रवर्गासाठी उपलब्ध तरतूदीच्या ५०% निधी विभागाच्या पातळीवरुन वितरीत करणे शक्य आहे. आणि उर्वरित निधी सामाजिक न्याय विभाग, आदिवासी विकास विभाग, नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने यथावकाश वितरित करण्याचा निर्णय घेण्यात येईल. त्यानुसार या उप-अभियानाकरिता सर्वसाधारण प्रवर्गाच्या उपलब्ध तरतूदीच्या ५० टक्के म्हणजे रु. ५० कोटी निधी (केंद्र हिस्सा रु. ३० कोटी व राज्य हिस्सा रु. २० कोटी) कृषि आयुक्तालयास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२१-२२ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानाच्या अंमलबजावणीकरिता रु. १५२४६.९३ लक्ष (रुपये एकशे बावन्न कोटी शेहेचाळीस लाख त्र्याण्णव हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे, त्याचे घटकनिहाय विवरण पुढीलप्रमाणे :

(रु.लक्षमध्ये)

| अ.क्र. | घटक | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | घटक क्र.३ शेतकऱ्यांना कृषि यांत्रिकीकरण औजारे आणि साहित्य यासाठी अनुदान | ६६९३.०० | ४४६२.०० | ११११५५.०० |
| २ | घटक क्र. ४ कृषि यंत्र/औजारे बँक स्थापन करण्यासाठी अनुदान | ७८०.०० | ५२०.०० | १३००.०० |
| ३ | घटक क्र. ५ उच्चतंत्रज्ञान व उत्पादनक्षम आधारित साहित्याचे हबची निर्मिती | ६००.०० | ४००.०० | १०००.०० |
| ४ | घटक क्र. ६ निवडलेल्या गावांमध्ये कृषि यांत्रिकीकरणास प्रोत्साहन | ३०७.२० | २०४.८० | ५१२.०० |
| ५. | प्रशासकीय खर्च | ७६७.९६ | ५११.९७ | १२७९.९३ |
| | **एकूण** | **९१४८.१६** | **६०९८.७७** | **१५२४६.९३** |

२. सन २०२१-२२ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानाच्या अंमलबजावणीकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.५००० लक्ष निधी (रुपये पन्नास कोटी फक्त) आयुक्त, कृषि यांना वितरित करण्यात येत आहे. या निधीमध्ये केंद्र हिश्श्याचा रु. ३००० लक्ष (रुपये तीस कोटी फक्त) व राज्य हिश्श्याचा रु. २००० लक्ष (रुपये वीस कोटी फक्त) निधीचा समावेश आहे. त्याचप्रमाणे, सदर उप अभियानांतर्गत अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा निधी स्वतंत्रपणे वितरित करण्यात येईल.

३. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु. ५००० लक्ष निधी खालील लेखाशिर्षाखाली चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमाक:- डी-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)११३-कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०८) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१ २५१३)<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमाक:- डी-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)११३-कृषि अभियांत्रिकी<br>(००)(१६) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ ८७३६)<br>३३ अर्थसहाय्य |

४. या उप-अभियानाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने वार्षिक कृति आराखड्यात मंजूर केलेल्या बाबींवर खर्ची टाकावा तसेच, अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांना महा-डीबीटी प्रणालीद्वारे आधार संलग्न बँक खात्यावर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

५. सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती/जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लक्ष यापैकी जे कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी ४०% किंवा रु.१ लक्ष यापैकी जे कमी असेल ते याप्रमाणे अनुदान देण्यात यावे.

६. इतर यंत्र/अवजारांच्या बाबतीत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर निधी खर्च करतान तो विहित कार्यपध्दती अनूसरून सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियाचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादे/C.V.C. तत्वानुसार/ प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कर्यालयाची राहील.

८. कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी, संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन उदिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

९. सदर अभियानाकरिता वितरित केलेला निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून आणि सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सरद परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११७१५५५४४९८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.01.17 15:57:56 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२.
३. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
४. अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
५. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व).
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता).

११. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१३. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई- ३२.
१४. निवड नस्ती (कार्यासन -१४अे).